**निसर्ग संरक्षण व वन्यपशू संवर्धन, व्याघ्र प्रकल्प मेळघाट या योजनेअंतर्गत निर्माण करण्यात आलेली १११ अस्थायी पदे सन २०१९-२० मध्ये पुढे चालू ठेवण्याबाबत...**

**महाराष्ट्र शासन**

**महसूल व वन विभाग**

**शासन निर्णय क्रमांक : डब्ल्यूएलपी ०३.१९/प्र.क्र.९३/फ-१**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,

मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.

दिनांक : १७ ऑक्टोंबर, २०१९.

**वाचावे :-**

१. महसूल व वनविभाग, शासन निर्णय क्रमांक : डब्ल्युएलपी ०३.१८/प्र.क्र.११४/फ-१ दिनांक २७.०३.२०१८.
२. महसूल व वनविभाग, शासन निर्णय क्रमांक : डब्ल्युएलपी ०३.१८/प्र.क्र.११४/फ-१ दिनांक ०३.१०.२०१८.
३. वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक : पदनि २०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क दिनांक २१.०२.२०१९.
४. मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र कक्ष-३/योजनेतर/ प्र.क्र. ०४/१८-१९/२२१६, दिनांक ०१.०३.२०१९.
५. महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्रमांक: डब्ल्युएलपी ०३.१८/प्र.क्र.९२/फ-१ दिनांक १२.०३.२०१९.
६. वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक : पदनि २०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क दिनांक ११.०९.२०१९.
७. महसूल व वनविभाग, शासन निर्णय क्रमांक : एमएफएस. २०१७/ प्र.क्र. ७७/ फ-८, दिनांक १३.०९.२०१९.

**प्रस्तावना:-**

निसर्ग संरक्षण व वन्यपशू संवर्धन, व्याघ्र प्रकल्प मेळघाट या योजनेअंतर्गत निर्माण करण्यात आलेल्या १११ अस्थायी पदांना सन २०१८-२०१९ मध्ये संदर्भ क्रमांक १ व २ च्या शासन निर्णयान्वये दिनांक ०१.०३.२०१८ ते दिनांक २८.०२.२०१९ पर्यत चालू ठेवण्यासाठी शासनाची मंजुरी प्रदान करण्यात आली आहे.

२. मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी संदर्भ क्रमांक ४ च्या पत्रान्वये निसर्ग संरक्षण व वन्यपशू संवर्धन, व्याघ्र प्रकल्प मेळघाट या योजनेअंतर्गत निर्माण करण्यात आलेल्या १११ अस्थायी पदांना सन २०१९-२० मध्ये दिनांक ०१.०३.२०१९ ते दिनांक २९.०२.२०२० पर्यंत चालू ठेवण्याबाबत प्रस्ताव शासन मान्यतेसाठी सादर केला होता.

३. प्रशासकीय विभागाच्या आकृतिबंधातील समाविष्ट असलेल्या अस्थायी पदांना तसेच यापूर्वी आढावा मंजूर केल्यानंतर निर्माण करण्यात आलेल्या परंतु त्यांचा समावेश आकृतीबंधात करण्यात

आलेला नाही, अशा अस्तित्वात असलेल्या सर्व अस्थायी पदांना दिनांक ०१.०३.२०१९ ते दिनांक ३०.०९.२०१९ पर्यंत मुदतवाढ देण्याचे अधिकार वित्त विभागाच्या संदर्भ क्रमांक ३ च्या शासन निर्णयान्वये संबंधित प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आले होते. त्यानुसार निसर्ग संरक्षण व वन्यपशू संवर्धन, व्याघ्र प्रकल्प मेळघाट या योजनेअंतर्गत निर्माण करण्यात आलेल्या १११ अस्थायी पदांना सन २०१९-२० मध्ये दिनांक ०१.०३.२०१९ ते दिनांक ३०.०९.२०१९ पर्यंत चालू ठेवण्यास संदर्भ क्रमांक ५ च्या शासन निर्णयान्वये मान्यता प्रदान करण्यात आली होती.

४. आता प्रशासकीय विभागाच्या आकृतिबंधातील समाविष्ट असलेल्या अस्थायी पदांना तसेच यापूर्वी आढावा मंजूर केल्यानंतर निर्माण करण्यात आलेल्या परंतु त्यांचा समावेश आकृतीबंधात करण्यात आलेला नाही, अशा अस्तित्वात असलेल्या सर्व अस्थायी पदांना दिनांक ०१.१०.२०१९ ते दिनांक २९.०२.२०२० पर्यंत मुदतवाढ देण्याचे अधिकार वित्त विभागाच्या संदर्भ क्रमांक ६ च्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आले आहेत.

**शासन निर्णय :-**

I. संदर्भ क्रमांक ७ च्या शासन निर्णयान्वये वन विभागाचा निश्चित करण्यात आलेल्या आकृतीबांधात निसर्ग संरक्षण व वन्यपशू संवर्धन, व्याघ्र प्रकल्प मेळघाट या योजनेअंतर्गत निर्माण करण्यात आलेल्या १११ अस्थायी पदांचा समावेश असल्यास सदर पदांना वित्त विभागाच्या संदर्भ क्र.६ च्या शासन निर्णयाच्या अधिन राहून सन २०१९-२० मध्ये दिनांक ०१.१०.२०१९ ते दिनांक २९.०२.२०२० पर्यंत पुढे चालू ठेवण्यास शासन मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

II. निसर्ग संरक्षण व वन्यपशू संवर्धन, व्याघ्र प्रकल्प मेळघाट या योजनेअंतर्गत निर्माण करण्यात आलेल्या १११ अस्थायी पदांच्या आस्थापनेवर होणारा खर्च २४०६- वनीकरण व वन्य जीवन (योजनेतर), ०२ पर्यावरणीय वनीकरण व वन्यजीवन, ११० वन्यजीवन संरक्षण (००) (००) (०१) निसर्ग संवर्धन व वन्य पशु संरक्षण (२४०६ ०७६६) या लेखाशीर्षाखाली सन २०१९-२० या आर्थिक वर्षात उपलब्ध होणाऱ्या तरतुदीतून भागविण्यात यावा.

III. सदरचा शासन निर्णय, वित्त विभागाच्या शासन निर्णय क्रमांक : असंक-१००४/प्र.क्र.१२ /(भाग-२)/२००४/वित्तीय सुधारणा-१, दिनांक ०४.१०.२००४ व क्रमांक : पदनि २०१६/प्र.क्र. ८/ १६/ विसु-१, दिनांक ११.०२.२०१६, क्रमांक: पदनि २०१६/प्र.क्र.८/१६/विसु-१, दिनांक २१.०९.२०१६, क्रमांक : पदनि २०१६/प्र.क्र. ८/१६/आ.पु.क, दिनांक २१.०२.२०१९ व क्रमांक : पदनि २०१६/प्र.क्र. ८/१६/आ.पु.क, दिनांक ११.०९.२०१९ अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारांच्या अनुषंगाने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९१०१७१४५४२८७३१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SWAPNIL DESHBHRATAR

Digitally signed by SWAPNIL DESHBHRATAR
DN: c=IN, st=Maharashtra,
2.5.4.20=9add558653210cf44615291102f1bf143783e8403be64c06c7928e692d77c386, postalCode=400037, street=MANTRALAYA,MUMBAI,
serialNumber=ce420aedd83773a67f861ab4c751835b3c5119f8fc41f2f3aa39bd7749dc02e0, ou=FOREST DEPARTMENT, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=SWAPNIL DESHBHRATAR
Date: 2019.10.17 14:55:45 +05'30'

**( स्वप्निल देशभ्रतार )**
विशेष कार्य अधिकारी
महसूल व वन विभाग.

**प्रति,**

१. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन बल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
२. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
३. प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
४. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव) , पुर्व नागपूर.
५. अपर मुख्य वनसंरक्षक व क्षेत्रसंचालक, मेळघाट व्याघ्र प्रकल्प, अमरावती.
६. महालेखापाल-१/२ (लेखा परीक्षा)/(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर,
७. फ-१ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई - ३२ (निवड नस्ती ).

**महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्रमांक: डब्ल्यूएलपी ०३.१९/प्र.क्र.९३/फ-१,**
**दिनांक:- १७ ऑक्टोंबर, २०१९ सोबतचे विवरणपत्र.**

(दिनांक ०१.१०.२०१९ ते दिनांक २९.०२.२०२० या कालावधीसाठी मुदतवाढ देण्यात आलेली पदे)

| अ.क्र. | पदाचे नाव | पदसंख्या |
|---|---|---|
| १ | मुख्य वनसंरक्षक व क्षेत्रसंचालक | १ |
| २ | उपवनसंरक्षक | १ |
| ३ | दस्तऐवज अधिकारी | १ |
| ४ | मुख्य लेखापाल | १ |
| ५ | लिपिक | १ |
| ६ | कलाकार | १ |
| ७ | संशोधन सहा.वनपाल | १ |
| ८ | संग्रहालय सहायक | १ |
| ९ | वाहनचालक | ७ |
| १० | महावत | २ |
| ११ | चाराकापी | २ |
| १२ | वनक्षेत्रपाल | १ |
| १३ | वनपाल | १५ |
| १४ | वनरक्षक | ६६ |
| १५ | नाईक | १ |
| १६ | शिपाई | ३ |
| १७ | चौकीदार | ३ |
| १८ | सफाई कामगार | ३ |
| **एकूण** | | **१११** |

***********